**सेवानिवृत्त कर्मचा-याकडून शासकीय निवासस्थानाच्या थकीत भाडे वसूलीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्र.शानिवा-२५/२०००/३८६८/प्र.क्र.६०२/२०००/२३-अ
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक-**१३ नोव्हेंबर, २००१.**

**शासन निर्णय**

बृहन्मुंबईतील शासकीय निवासस्थानात रहाणा-या अधिकारी/कर्मचारी यांना सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.शानिवा-१०९५/प्र.क्र.८०७/९५/२३-अ, दि.१० सप्टेंबर, १९९६ अन्वये सेवानिवृत्ती, बदली अथवा सेवेत असताना निधन झाल्यास, त्याच्या कुटूंबियांना शासकीय निवासस्थान रिक्त करुन देण्यास ३ महिन्याचा अनुज्ञेय कालावधी दिला जातो. या ३ महिन्याच्या अनुज्ञेय कालावधीसाठी सवलतीच्या दराने भाडे आकारण्यात येते. अनुज्ञेय कालावधीनंतर निवासस्थान रिक्त करुन न दिल्यास प्रति चौरस फुट रु.१०/- दराने दंडनीय भाडे आकारण्यात येते. अनुज्ञेय कालावधीनंतर निवासस्थान रिक्त करुन दिले जात नाही. त्यामुळे संबंधित अधिकारी/कर्मचारी सेवानिवृत्त झाल्यानंतर शासकीय निवासस्थानाचे थकीत दंडनीय भाडे वसूल करण्यास अडचण उद्‌भवते. शासकीय निवासस्थानांच्या दंडनीय भाडे वसूलीच्या रकमा या शासकीय येणे रकमा समजून निवृत्तीवेतन विषयक लाभाच्या थकबाकीच्या रकमेतून समायोजित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम-१९८२ मधील निमय-१३२ च्या तरतुदीनुसार शासकीय निवासस्थानाशी संबंधित दंडनीय भाडे वसूलीच्या रकमा, शासकीय येणे रकमा ठरत असल्यामुळे सुधारीत निवृत्तीवेतन विषयक लाभांच्या थकबाकीतून सदरहू रकमांची वसूली करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. सुधारीत निवृत्तीवेतन विषयक लाभांच्या थकबाकीच्या रकमा सेवानिवृत्त अधिकारी/कर्मचा-यांना अदा करण्यापूर्वी संबंधित अधिकारी/कर्मचारी यांचेकडे शासकीय निवासस्थानांच्या दंडनीय भाडे वसूलीची थकबाकी नसल्याची खात्री कार्यकारी अभियंता, सा.बां., इलाखा शहर, जुने जकात घर, मुंबई-२३ व कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई विभाग, सा.बां., अंधेरी (प), मुंबई-५८ यांचेकडे करावी. शासकीय निवासस्थानाच्या दंडनीय भाडे वसूलीची थकबाकी असल्यास, सुधारीत निवृत्तीवेतन विषयक लाभांच्या थकबाकीतून ती वळती करुन घ्यावी.

शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.-२१०/०१/सेवा।४, दि.२५.६.२००१ अन्वये निर्गमीत करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

**सही/-**
**(दे.त्र्यं.कुमावत)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**कृ.मा.प.**